सेंट जॉर्जेस रुग्णलय, मुंबई येथील शवागृहाचे श्रेणीवर्धनांतर्गत बांधकाम करण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : एसएचएम-२०२३/प्र.क्र.२१०/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : ०७ ऑगस्ट, २०२४

**वाचा :** १) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय, समक्रमांक दि.०६.११.२०१८

२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/ सेंटजॉर्जेसरु /शवगृहाश्रेणीसुधारीतप्रस्ताव/आय-प/१३८१, दि.३१.०५.२०२३

३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/सेंट जॉर्जेसरु/शवगृहसुधारीत प्रस्ताव/आय-प/२४३०, दिनाक १०.०८.२०२३

४) वित्त विभाग,पत्र क्र.व्यंअस-२०२४/प्र.क्र.६१/अर्थ -२, दि. ११.०७.२०२४

**प्रस्तावना :**

विभागाच्या अधिपत्याखालील सेंट जॉर्जेस रुग्णालय,मुंबई येथील शवागृहाचे श्रेणीवर्धनांतर्गत बांधकाम करण्याकरीता विभागाने संदर्भ क्र.०१ येथील शासन निर्णयान्वये रुपये २,०८,९३,९१६/- इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. तथापि, तांत्रिक कारणांमुळे सदर बांधकामाच्या अंदाजपत्रकात वाढ झालेली असल्यामुळे सुधारीत अंदाजपत्रकास मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.०२ व ०३ अन्वये वैद्यकीय शिक्षण संचालनालयाकडून प्राप्त झाला होता. त्यानुषंगाने सदर प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभाग, वित्त विभाग व व्यय अग्रक्रम समितीसमोर मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर सुधारीत प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने सहमती दर्शविली असल्याने सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विभागाच्या अधिपत्याखालील सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई येथील शवागृहाचे श्रेणवर्धनांतर्गत बांधकाम करण्यासाठी सदर बांधकामाच्या अंदाजपत्रकात वाढ झालेली असल्यामुळे रुपये ५,९४,९९,९४७/- (रुपये पाच कोटी, चौऱ्याण्णव लक्ष, नव्याण्णव हजार, नऊशे सत्तेचाळीस मात्र) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास व्यय अग्रक्रम समितीने त्यांच्या दिनांक ०३.०७.२०२४ रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. सदर मान्यता व पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयाव्दारे सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्याबाबतचा तुलनात्मक ‘ प्रपत्र-अ ’ येथे जोडले आहे.

| अ.क्र. | बांधकामाचे नाव | मूळ प्रशासकीय मान्यता किंमत | अधिक्य किंमत / वाढीव किंमत | सुधारीत अंदाजित किंमत |
|---|---|---|---|---|
| १. | Construction of Mortury Building in the premises of St.Georges Hospital | २,०८,९३,९१६.८४ | ३,८६,०६,०३०.६४ | ५,९४,९९,९४७.४८ |

| अ.क्र. | बांधकामाचे नाव | मूळ प्रशासकीय मान्यता किंमत | अधिक्य किंमत / वाढीव किंमत | सुधारीत अंदाजित किंमत |
|---|---|---|---|---|
| | bearing C.S.no.1454 (Part) 676 A at-Mumbai | | | |
| एकूण | | २,०८,९३,९१६.८४ | ३,८६,०६,०३०.६४ | ५,९४,९९,९४७.४८ |

अटी :-

१) सदर विषयी संदर्भ ०१ येथे नमूद शासन निर्णयातील सर्व अटी व लेखाशीर्षाचे माध्यम कायम राहील.

२) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३) सदर योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा कार्यपद्धती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने निदेशांचे व त्रुटींची पुर्तता करण्यात यावी.

४) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही, अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्यात यावी. याबाबतची जबाबदारी संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागीय कार्यालयाची राहील.

२. सदर शासन निर्णय, मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०३.०७.२०२४ रोजी आयोजित व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीत प्राप्त सहमती व त्यानुषंगाने प्राप्त इतिवृत्तानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०७१८०५३३०६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.08.02 20:04:39 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
२. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

३. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (वि.सु.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
९. उपसचिव मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
१०.संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
११.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मुंबई विभाग
१२.अवर सचिव (कार्या क्र.अर्थ-२), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अधिष्ठाता, सर ज.जी.समूह रुग्णलये, मुंबई
१४.अधिक्षक, सेंट जॉर्जेस रुग्णालय, मुंबई
१५.कार्यकारी अभियंता, एकात्मिक घटक (सा.बां.) विभाग, मुंबई
१६.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१७.निवासी लेखाधिकारी, मुंबई
१८. निवडनस्ती (प्रशा-१).

शासन निर्णय क्रमांक एसएचएम-२०२३/प्र.क्र.२१०/प्रशा-१, दिनांक ०७.०८.२०२४ चे सहपत्र

परिशिष्ट-अ

| बाब | मूळ परिमाण | सुधारीत परिमाण | मूळ किंमत | सुधारीत किंमत | वाढ/घट |
|---|---|---|---|---|---|
| इमारत बांधकाम | ३९४.७८ चौ.मी. | ७५४ चौ.मी. | १,१५,००,७३० | ३,२५,९४१.४२ | २,१०,६९,२११,४२ |
| विद्युतीकरण | - | - | २६,६४,१३१.४० | १,०९,८६,६९७ | ८३,२२,५६५.६० |
| फर्निचर | - | - | १५,००,००० | १४,३१,९३०.३९ | -६८०६९.६१ |
| संरक्षक भिंत व आरसीसी रॅम्प | - | ६३.०९ मी. | १८,००,००० | ३८,७५,६६७.६३ | २०,७५,६६७.६३ |
| वस्तु व सेवा कर | - | - | २०,९५,७८३.३७ | ६८,४७,९५९.१० | ४७,५२,१७३.७३ |
| आकस्मिक खर्च-४ % | - | - | ४,६०,०२९ | १५,१५,१०१.५८ | १०,५५,०७२.५८ |
| कॉन्टेज खर्च-५ % | - | - | ८,७३,२४३.०७ | १८,९३,८७६.९७ | १०,२०,६३३.९० |
| कामगार विमा-१ % | - | - | ०० | ३,७८,७७५,३९ | ३,७८,७५५.३९ |
| एकूण | | | २,०८,९३,९१६.८४ | ५,९४,९९,९४७.४८ | ३,८६,०६,०३०.६४ |

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2024.08.02 20:05:26 +05'30'

( सुधीर जया शेट्टी )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन